सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त आश्रमशाळांमधील अनलॉक लर्निंग उपक्रम राबविण्याकरीता निधी वितरण.

लेखाशीर्ष (२२२५ डि७३४, २२२५ एफ१२९, २२२५ सी९९९, २२२५ २५८७)

**महाराष्ट्र शासन.**

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ०१ / कार्यासन-६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ०९ नोव्हेंबर, २०२०.

**वाचा -**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४ /अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. अआशा-२०२०/प्र.क्र.७९/का-११दि.०९.१०.२०२०

**प्रस्तावना:-**

राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली परिस्थिती विचारात घेऊन आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त शाळांमधील विद्यार्थ्यांना घरपोच शिक्षण देण्याच्या अनुषंगाने शासकीय आश्रमशाळा, एकलव्य निवासी आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा व नामांकित शाळा यामध्ये अनलॉक लर्निंग हा पर्यायी शिक्षण उपक्रम राबविण्यास संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. या अनुषंगाने आयुक्त, आदिवासी विकास यांना निधी वितरीत करण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त शासकीय आश्रमशाळा, एकलव्य निवासी आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा व नामांकित शाळा यामध्ये अनलॉक लर्निंग उपक्रम राबविण्याकरीता खालीलप्रमाणे निधी वितरणास मान्यता देण्यात येत आहे. (रु. हजारात)

| अ.क्र | योजनेचे नाव व लेखाशीर्ष | बाब | अर्थसंकल्पीत तरतूद | सदर शा.नि.द्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी. |
|---|---|---|---|---|
| १ | शासकीय आश्रमशाळा (२२२५ डी-७३४) | २१- साधन सामुग्री | २५०००००.०० | ११०१२७.६० |
| २ | अनुदानित आश्रमशाळा (२२२५ एफ १२९) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ४५०००००.०० | १४०६५३.२० |
| ३ | एकलव्य निवासी आश्रमशाळा (२२२५ २५८७) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | २५००००.०० | ३०००.०० |
| ४ | नामांकित आश्रमशाळा (२२२५ सी ९९९) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ३६०००००.०० | ३२१७५.६० |
| एकुण | | | | २८५९५६.४० |

२. उपरोक्त प्रमाणे, **रु. २८५९५६.४० हजार (अक्षरी रुपये अठ्ठावीस कोटी एकोणसाठ लाख छप्पन हजार चारशे फक्त)** इतका निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर नियंत्रक अधिकारी तथा **आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक** यांना वितरीत करण्यात आला आहे. लॉक डाऊनमुळे पुढील कालावधीत राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर वितरीत निधी संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या अटी व शर्तीस अनुसरुन खर्च करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व अनौपचारिक संदर्भ क्र.५०६ /व्यय १४, दि.०७.१०.२०२० अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०४१३१३५९४६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.11.09 17:31:26 +05'30'

**(किरण कि. पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४ व अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई.
९. सर्व सहसचिव/उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
११. निवड नस्ती (का-६).